**जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, ठाणे या कार्यालयासाठी महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, चरई, ठाणे या इमारतीतील तिसऱ्या मजल्यावरील २७७७ चौ.फूट जागा भाडेतत्वावर घेण्यास व भाडे प्रदान करण्यास वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : जागाभा-२०२०/प्र.क्र. ३४/२२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय(वि),मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ जुलै, २०२०.

संदर्भ :- सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.

१) सर्वसा/ १५-सआ/जिविलेप-१ए ठाणे/का.स्थलां.परवानगी/२०२०/५८५, दि.२८.०२.२०२०.

२) स.आ./१५-सआ/जिविलेप-१ ठाणे/का.भाडे परवानगी/२०२०/८६७, दिनांक ०७.०७.२०२०.

**प्रस्तावना :-**

जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, ठाणे हे कार्यालय मागील २५ ते ३० वर्षापासून ठाणे महानगरपालिका कर्मचारी सहकारी पतसंस्था मर्या. ठाणे या सहकारी संस्थेच्या मालकीच्या इमारतीत महात्मा फुले सहकार भवन, कडवा गल्ली, जांभळी नाका, ठाणे (प) येथे भाडेतत्वावर कार्यरत आहे. सदर इमारत ही सन २००७ पासून “अत्यंत धोकादायक” म्हणून ठाणे महानगरपालिका, ठाणे यांनी घोषित केलेली आहे. त्यामुळे महानगरपालिकेने सदर इमारत २४ तासांचे आत खाली करणेबाबत वेळोवेळी नोटीस वरील कार्यालयास दिलेली आहेत. सदर धोकादायक इमारतीचा संभाव्य धोका विचारात घेता, भविष्यातील जिवीत व वित्त हानी टाळण्यासाठी विषयांकित कार्यालय नवीन जागेत तातडीने स्थलांतरीत करणे अत्यंत आवश्यक होते. जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, ठाणे या कार्यालयासाठी महानगर टेलिफोन निगम लिमिटेड,चरई, ठाणे या इमारतीतील तिसऱ्या मजल्यावरील २७७७ चौ.फूट जागा भाडेतत्वावर रुपये ६९/- प्रति चौ.फुट (बांधीव क्षेत्रफळासाठी/बिल्टअप) या दराने भाडेतत्वावर घेण्यास व त्याप्रमाणे दरमहा भाडे महानगर टेलिफोन निगम लिमिटेड,चरई, ठाणे अदा करण्यास वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** :-

जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, ठाणे या कार्यालयासाठी महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, चरई टेलिफोन एक्सचेंज बिल्डींग, चरई, ठाणे (पश्चिम) या इमारतीतील तिसऱ्या मजल्यावरील २७७७ चौ.फूट जागा भाडेतत्वावर घेण्यास व रुपये ६९/- प्रति चौ.फुट (बांधीव क्षेत्रफळासाठी/बिल्टअप) दराने येणाऱ्या एकूण रुपये १,१९,६१३/- (अधिक महानगरपालिका कर, वस्तु व सेवा कर इ.कर रक्कम जी देय असेल ती ) इतक्या प्रति माह येणाऱ्या खर्चाच्या भाडेची रक्कम अदा करण्यास वित्तीय व प्रशासकीय मान्यता याद्वारे प्रदान करण्यात येत आहे.

२. वरील भाडयाच्या रक्कमेबाबत जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, ठाणे यांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यास याद्वारे घोषित करण्यात येत आहे.

३. या वरील होणारा खर्च, मागणी क्र. व्ही-२ , २४२५, सहकार, १०१, सहकारी संस्थांचे लेखापरीक्षण (००) (०१) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (अनिवार्य), १४-भाडेपट्टी व कर (२४२५००२२७) या खाली दरवर्षी आर्थिक वर्षात मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उक्त शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : व्हीअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३, विनियम/भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वयेवित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-एक मधील अनु.क्र.१०, नियम क्रमांक ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च, १९६५ नियम १४७ (क) खालील टीप-१, कार्यालयीनसाठी जागा भाडयाने घेण्यास मंजूर करण्याबाबतचे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००७३११५५४३७८४०२.असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJU KALLUJI NARPANDE

Digitally signed by RAJU KALLUJI NARPANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=445c05397d3e5fac583c028b06de2a1fa2b5374 3e982f5c31c9f3ffb560b0c16, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f8faa195025519ecce143f48fe16b8572d27 9b7779146441b412b267fb25acd8, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJU KALLUJI NARPANDE
Date: 2020.07.31 17:22:00 +05'30'

**( राजू नरपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष, विधान सभा/मा.सभापती, विधानपरिषद,विधान भवन,मुंबई.

२. मा.मंत्री (सहकार), यांचे खाजगी सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

३. मा.राज्यमंत्री (सहकार), यांचे खाजगी सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. सर्व मा. विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.

५. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

६. सर्व विभागीय आयुक्त,

७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

८. सर्व जिल्हाधिकारी,

९. उपसचिव, कार्यासन (५-स), (१२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,

१०. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था, (लेखापरिक्षण) मुंबई विभाग, नवी मुंबई,

११. जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, ठाणे

१२. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक १, ठाणे, सा.बां.विभाग आवार, स्टेशन रोड, ठाणे (प)-४०० ६०१

१३. अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (विनियम) मंत्रालय, मुंबई,

१५. महालेखापाल (ले व ह) महाराष्ट्र,१, मुंबई.

१६. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र,१, मुंबई.

१७. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

१८. निवड नस्ती (२२- स).